महाराष्ट्र विकास सेवा गट-अ अंतर्गत परिविक्षाधिन अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी या पदावरील नियमित नेमणूका- राज्यसेवा मुख्य परिक्षा- २०१२.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मविसे-१०१४ /प्र.क्र.२८८/२०१४/आस्था-३

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ०२ जानेवारी, २०१५

**संदर्भ-**

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे-१०/२०१३/प्र.क्र.१७५/ आस्था-३अ, दिनांक १५ जानेवारी, २०१४.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.१/१०/१२, दिनांक ८ जून, २०१०.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विकास सेवेतील उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी (गट-अ) मध्ये ६ परिविक्षाधिन अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आली होती. त्यापैकी खाली नमुद केलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा प्रशिक्षण कालावधी पूर्ण केलेला आहे. यास्तव सदर अधिकाऱ्यांचा प्रशिक्षण कालावधी समाप्त करुन त्यांना संदर्भाधीन क्र.२ च्या शासन अधिसूचनेअन्वये प्रसिध्द केलेल्या विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप याबाबत नियमावली, २०१० मधील तरतूदींनुसार त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर नियमित नियुक्ती देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | नियमित नियुक्ती दिलेले पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ |
| १. | श्री.पी.बी. काळे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती खालापूर, जि.रायगड | रिक्त पदी |

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | नियमित नियुक्ती दिलेले पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ |
| २. | श्री.व्ही.जी. नलावडे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती परांडा, जि.उस्मानाबाद | रिक्त पदी |
| ३. | श्री.व्ही.जी. तनपूरे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती अक्राणी-धडगांव, जि.नंदूरबार | रिक्त पदी |
| ४. | श्री.आर.एस. लाहोटी | गट विकास अधिकारी, पंचायत समिती खुलताबाद, जि.औरंगाबाद | रिक्त पदी |
| ५. | श्री.आर.ए. शेळके | गट विकास अधिकारी, पंचायत समिती महागांव, जि.यवतमाळ. | रिक्त पदी |
| ६. | श्री.ए.आर. लोकरे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती पोंभुर्णा, जि.चंद्रपूर | रिक्त पदी |

२. संबंधित विभागीय आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वरील अधिकाऱ्यांस त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्यासाठी त्वरीत कार्यमुक्त करावे.

३. वरील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियमित पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. विहित कालावधीत (पदग्रहण अवधी वगळता) पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यास टाळाटाळ केल्यास अथवा रजेवर गेल्यास अथवा नियुक्तीत बदल करुन घेण्यासाठी अशासकीय व्यक्तीमार्फत शासनावर दबाव आणल्यास त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

४. सदर अधिकाऱ्यांचा परिविक्षाधिन कालावधी समाप्त झाल्यानंतर त्याबाबतचा मुल्यांकन अहवाल संबंधित मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी शासनास सादर करावा. सदर अधिका-यांचा मुल्यांकन अहवाल शासनास प्राप्त झाल्यानंतर त्यांचा परिविक्षाधिन कालावधी समाप्त करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०२११३२११०४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Bandekar-Deshmukh Sarita Rishi
Date: 2015.01.02 15:50:12 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त, कोकण / नाशिक/पुणे / औरंगाबाद/ अमरावती / नागपूर.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड / नंदूरबार/ पुणे/ कोल्हापूर/ सातारा/ सांगली/उस्मानाबाद/ औरंगाबाद/ यवतमाळ/ चंद्रपूर.
३) संबंधित अधिकारी (संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे/ कोल्हापूर/ सांगली / सातारा/ औरंगाबाद/ उस्मानाबाद मार्फत)
४) महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
५) मा.मंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्यमंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
७) मा.प्रधान सचिव, (ग्रा.वि.व पं.रा.) यांचे स्वीय सहायक.
८) अवर सचिव (आस्था-२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
९) कक्ष अधिकारी (आस्था-३अ), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती, आस्था-३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई